प्रमुख खाणपट्टयाचे ई लिलावानंतर सर्वोच्च बोलीधारक घोषीत झाल्यांनतर ते खानक्षेत्रातून प्रत्यक्षरित्या उत्खनन व वाहतूक सूरु होईपर्यत, खाणभाडेपट्टा मंजूर होऊन प्रक्रियेमध्ये येणा-या अडचणीच्या अनुषंगाने प्रगतीचा आढावा व उपाययोजना करण्याच्या दृष्टीने राज्य खनिकर्म कार्यक्रम व संनियंत्रण समिती स्थापन करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग
शासन निर्णय क्र. एमएनजी-०१२५/प्र.क्र.१२/उ-९अ
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- ०४ जून,२०२५

**वाचा:** १. केंद्रिय खाण मंत्रालय यांचे पत्र क्र.०७/८/२०२३-माईन IV (Part १), दि.०२.०९.२०२४
२.केंद्रिय खाण मंत्रालय यांचे पत्र क्र.०७/१७/२०२३-माईन IV, दि.२६.०९.२०२४

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यात प्रमुख खनिजाच्या ई-लिलावाद्वारे प्रस्तावित वाटप क्षेत्रातून विहीत कालावधीत उत्खनन व वाहतूक सुरु होण्याच्या दृष्टीने, हेतूपत्र दिल्यानंतर खाणपट्टाधारकांना शासनाच्या विविध विभागाकडून वेगवेगळया परवानग्या व मान्यता घेणे, जमीन संपादन करणे यामध्ये बराच वेळ जातो. या अनुषंगाने अशा ई-लिलाव झालेल्या खाणक्षेत्रासंदर्भात केंद्र शासन, राज्य शासन, तसेच महासंचालक, भू. व ख. यांच्या पातळीवर वारंवार आढावाही घेण्यात येतो, त्याअनुषंगाने महासंचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर यांचेकडून प्रस्ताव विभागास प्राप्त झाल्यानंतर, आवश्यक तपासणी करुन, प्रस्ताव शासनाच्या विहित मान्यतेकरिता तात्काळ सादर करण्याची कार्यवाही वेळोवेळी करण्यात येते. ऐवढे करुनही पर्यावरण,वन ,जलसंपदा इ. विभागाकडून विहीत कालावधीत खाणपट्टाक्षेत्रास नाहरकत न प्राप्त होणे, हेतूपत्रातील विविध विभागाशी संबंधित अटींची पुर्तता न होणे, इत्यादी कारणास्तव हेतूपत्रास बोलिधारकांकडून मुदतवाढ मागितली जाते.

परिणामी, खाणक्षेत्रातून विहीत कालावधीत उत्खनन व वाहतूक होऊ न शकल्याने, राज्याला प्राप्त होणा-या महसूलापासून वंचित राहावे लागते. याचाच परिणाम प्रधानमंत्री खनिज क्षेत्र कल्याण योजनेच्या अंतर्गत प्राप्त होणा-या या निधीमध्ये तूटवडा/तफावत निर्माण होते अंतिमत: राज्याअंतर्गत विकासासाठी प्राप्त होणा-या महसूलावर मोठा विपरित परीणाम दिसून येतो सदर परिणामास पर्याय म्हणून खाणपट्टयांच्या ई लिलावा पासून ते खनिजाचे उत्खनन व वाहतूक टप्प्यामध्ये विविध विभागाची सक्रिय भूमिका आवश्यक आहे.

उपरोक्त बाब लक्षात घेता तसेच भारत सरकार, खाण मंत्रालय, नवी दिल्ली यांचे अनुक्रमे दिनांक २ सप्टेबर, २०२४ व दिनांक २६ सप्टेबर, २०२४ रोजीचे पत्रान्वये केलेली विनंती लक्षात घेता, खाणपट्टयाचे ई लिलाव झाल्यानंतर सर्वोच्च बोलीधारक घोषीत झाल्यापासून ते खाणक्षेत्रातून प्रत्यक्षरित्या उत्खनन व वाहतूक सूरु होईपर्यतच्या, प्रक्रियेमध्ये येणा-या अडचणीच्या अनुषंगाने प्रगतीचा आढावा व उपाययोजना सुचविण्याच्या उद्दिष्टाने मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली राज्य खनिकर्म कार्यक्रम व संनियंत्रण समिती स्थापित करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

खाणपट्टयाचे ई लिलावानंतर सर्वोच्च बोलीधारक घोषीत झाल्यांनतर ते खानक्षेत्रातून प्रत्यक्षरित्या उत्खनन व वाहतूक सूरु होईपर्यतच्या टप्प्यामध्ये येणा-या अडचणीच्या अनुषंगाने प्रगतीचा आढावा व उपाययोजना सुचविण्याच्या उद्दिष्टाने मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे राज्य खनिकर्म कार्यक्रम व संनियंत्रण समिती गठित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदाधिकारी | पदनाम |
|---|---|---|
| १ | मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य | अध्यक्ष |
| २ | सचिव/प्रधान सचिव/ अपर मुख्य सचिव, खनिकर्म विभाग | सदस्य |
| ३ | सचिव/प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव, वन विभाग | सदस्य |
| ४ | सचिव/प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव, जलसंपदा विभाग | सदस्य |
| ५ | सचिव/प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव, महसूल विभाग | सदस्य |
| ६ | सचिव/प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग | सदस्य |
| ७ | खाणपट्टयांशी संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी | निमंत्रित सदस्य |
| ८ | आय.बी.एम (Indian Beauro of Mines) यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ९ | महासंचालक / संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर | सदस्य सचिव |

**समितीची कार्यकक्षा:-**

समितीची कार्यकक्षा खालील प्रमाणे राहिल.

१) राज्यातील विविध प्रमुख खनिजांच्या खाणपट्टयांच्या ई लिलावानंतर सर्वोच्च बोलीधारक घोषीत झाल्यांनतर ते खाणक्षेत्रातून प्रत्यक्षरित्या उत्खनन व वाहतूक सूरु होईपर्यत, खाणपट्टा मंजूर होण्याच्या प्रक्रियेमध्ये येणा-या अडचणींचा अनुषंगाने प्रगतिचा आढावा व

उपाययोजनाच्या अनुषंगाने सर्व यंत्रणांमध्ये समन्वय व आढावा घेऊन उपाययोजना सुचविणे.

२) खाणपट्टयाशी सबंधित आवश्यक व वन आणि पर्यावरण परवानग्या विहित कालावधीत प्राप्त होण्यासाठी आढावा घेऊन सबंधितांना सूचना देणे.

३) या अनुषंगाने खाणपट्टयांधारकांना येणा-या विभागनिहाय अडचणीच्या अनुषंगाने आढावा व उपाययोजना सूचविणे.

**समितीचा बैठकांचा कालावधी:-**

उपरोक्त समितीची बैठक तीन महिन्यांतून एकदा आयोजित करण्यात येईल तथापी आवश्यकतेनुसार समिती अध्यक्षाच्या निर्देशान्वये समितीची बैठक आयोजित केली जाईल. सदर समितीच्या विचारार्थ सादर करावयाचे विषय/मुद्दे महासंचालक, भुविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर यांनी शासनास सादर करावे त्यासाठी त्यांनी सर्व संबंधितासह मासिक आढावा बैठक घेवून त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

उपरोक्त शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळ www.maharashtra.gov.in वर उपलब्ध करुन देण्यात येत आहे. त्याचा संगणक संकेताक २०२५०६०४१४४३३०३११० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशाने व नावाने,

LAXMIKANT GOPALRAO DHOKE

Digitally signed by LAXMIKANT GOPALRAO DHOKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=413beeca50b65438c7a037917ccf1f24d8ca684b65640df6372ea731ffac4dfc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E714BBCD4D43C6782884C7E7A2091F9F1EDC1D97EBB542C48B98FB8C8BDD6CF4, cn=LAXMIKANT GOPALRAO DHOKE
Date: 2025.06.04 15:15:46 +05'30'

**(लक्ष्मीकांत ढोके)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई-३२
४. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई-३२
५. मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई-३२
६. मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई-३२
७. मा.विधानमंडळ सदस्य (सर्व)
८. मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२
९. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०.अपर मुख्य सचिव (खनिकर्म विभाग), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग मंत्रालय, मुंबई-३२
११.प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव पर्यावरण व वातावरण बदल विभाग
१२.प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव महसूल व वन विभाग

१३.प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव जलसंपदा विभाग

१४.महासंचालक/संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर

१५.सर्व जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, खनिकर्म शाखा, संबधित जिल्हा.

१६.आय.बी.एम (Indian Beauro of Mines) यांचे प्रतिनिधी

१७. जिल्हा खनिकर्म अधिकारी (सर्व जिल्हे)

१८.निवडनस्ती (उद्योग-९अ)